राज्यातील अल्पसंख्याक बहुल ग्रामीण क्षेत्रात मूलभूत/ पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी अनुदान वितरित करण्यास मंजूरी देण्याबाबत-सन २०१४-१५ - रायगड

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्राक्षेयो-२०१५/प्र.क्र.४७/का.९**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ३० मार्च, २०१५.

वाचा -

१.शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांकः ग्राक्षेवि-२०१४/प्र.क्र.५१/१४/का.७, दिनांक २१/०६/२०१४.
२.शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांकः क्षेविका-२०१४/प्र.क्र.१०२/का.७, दिनांक १५/०१/२०१५.
३. शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांकः ग्राक्षेयो-२०१४/प्र.क्र.१५७/का.९, दिनांक १५/०१/२०१५.
४.शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांकः ग्राक्षेयो-२०१४/प्र.क्र.१५९/का.९, दिनांक १५/०१/२०१५.
५.शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांकः ग्राक्षेयो-२०१४/प्र.क्र.१६१/का.९, दिनांक १५/०१/२०१५.
६.शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांकः ग्राक्षेयो-२०१५/प्र.क्र.४७/का.९, दिनांक १६/०३/२०१५.

**शासन निर्णय-**

राज्यातील अल्पसंख्याक बहुल ग्रामीण क्षेत्रात मुलभूत/ पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देऊन ग्रामीण भागात वास्तव्यास असलेल्या अल्पसंख्याक लोकसमुहातील नागरिकांच्या जीवनमानाचा दर्जा उंचावण्यासाठी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये सन २०१४-१५ या वर्षासाठी ग्रामीण क्षेत्र विकास कार्यक्रम कार्यान्वित करण्यास मंजूरी देण्यात आली आहे.

२. या ग्रामीण क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत संदर्भ क्र.२ अन्वये औरंगाबाद जिल्ह्यातील ग्रामपंचायतींकरिता रू.३,३३,६५,०००/-(अक्षरी रु. तीन कोटी तेहतीस लक्ष पासष्ठ हजार फक्त), संदर्भ क्र.३ अन्वये ठाणे जिल्ह्यातील ग्रामपंचायतींकरिता रू.९५,९५,८७७/-(अक्षरी रु. पंचाण्णव लक्ष पंचाण्णव हजार आठशे सत्त्याहत्तर फक्त), संदर्भ क्र.४ अन्वये बीड जिल्ह्यातील ग्रामपंचायतींकरिता रू.८९,८०,०००/-(अक्षरी रु. एकोणनव्वद लक्ष ऐंशी हजार फक्त), संदर्भ क्र.५ अन्वये सातारा जिल्ह्यातील ग्रामपंचायतींकरिता रू.१,१०,००,०००/-(अक्षरी रु. एक कोटी दहा लक्ष फक्त) व संदर्भ क्र.६ अन्वये १० जिल्ह्यातील ग्रामपंचायतींकरिता रू. ८,९१,९८,९३४/- (अक्षरी रू. आठ कोटी एक्यान्नव लक्ष अठ्यान्नव हजार नऊशे चौतीस फक्त) असे एकूण १५,२१,३९,८११/- (अक्षरी रू. पंधरा कोटी एकवीस लक्ष एकोणचाळीस हजार आठशे अकरा फक्त) एवढे अनुदान वितरित करण्यात आले आहे.

३. त्यानंतर या कार्यक्रमांतर्गत सन २०१४-१५ वर्षात अनुदान मिळण्यासाठी जिल्हाधिकारी यांच्यामार्फत शासनास प्राप्त झालेल्या अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींच्या प्रस्तावांची छाननी करण्यात आली. छाननीअंती विहित निकषांनुसार अनुदान मिळण्यास पात्र ठरलेल्या संबंधित जिल्हयातील अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींना या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट- “अ” मध्ये दर्शविल्याप्रमाणे रायगड-०३ ग्रामपंचायतींना रु. ३०,००,०००/- (अक्षरी रू. तीस लक्ष फक्त) ग्रामीण क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत अनुदान मंजूर करण्यात येत असून हे अनुदान संबंधित जिल्हाधिकारी यांचेमार्फत मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद यांच्या स्वाधीन करण्यात येत आहे.

३. संबंधित अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींना मंजूर करण्यात आलेले अनुदान वितरित करण्यासाठी संबंधित जिल्हाधिकारी नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील.

४. अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींनी मागणी केल्यानुसार ज्या विवक्षीत प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे, केवळ त्याच प्रयोजनासाठी संबंधित अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींनी निधी खर्ची टाकणे अनिवार्य आहे. संबंधित जिल्हाधिकारी / मुख्य कार्यकारी अधिकारी , संबंधित जिल्हा परिषद यांच्याकडून अनुदान वितरित करण्यात आल्यानंतर अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींनी प्रस्तावात नमूद केलेली कामे पूर्ण करणे आवश्यक आहे व याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे या शासन निर्णयाच्या परिशिष्ट - "ब" मध्ये विहित केलेल्या नमुन्यात अल्पसंख्याक विकास विभागाकडे सादर करणे आवश्यक आहे. ग्रामीण क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत राज्यातील संबंधित अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींनी हाती घेतलेल्या विकासकामांच्या प्रगतीबाबत संनियंत्रण करुन त्याबाबतचा अहवाल संबंधित जिल्हाधिकारी यांनी शासनास सादर करावा.

५. या योजनेंतर्गत होणारा खर्च " मागणी क्र. झेड ई -१, २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण, १९८-ग्रामपंचायतींना सहाय्य, राज्य योजनांतर्गत योजना, ०१ अल्पसंख्याकांना सहाय्य, (०१) (०१) अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींना सहायक अनुदान (२२३५ बी ०८५)" या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात येईल.

६. हे आदेश नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२५१/१४७५, दि. ३ सप्टेंबर, २०१४ अन्वये प्राप्त मान्यतेस तसेच वित्त विभागाने त्यांच्या अनौचारिक संदर्भ क्र.१७६/१५/व्यय ४, दि. २४ फेब्रुवारी, २०१५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३०११४८४७१७१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GANGURDE SANJAY SURYAKANT

Digitally signed by GANGURDE SANJAY SURYAKANT
DN: CN = GANGURDE SANJAY SURYAKANT, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = MINORITIES DEVELOPMENT,CID - 919995
Date: 2015.03.30 11:59:01 +05'30'

( सं.सु.गांगुर्डे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
४. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,
५. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
६. महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा) , मुंबई / नागपूर,
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
९. संबंधित जिल्हाधिकारी/ मुख्य कार्यकारी अधिकारी, संबंधित जिल्हा परिषद
१०. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, संबंधित जिल्हा परिषद
११. मा.मंत्री (अल्पसंख्याक विकास) यांचे खाजगी सचिव,
१२. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
१३. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (प्रसिध्दीसाठी),
१४. निवडनस्ती,

**शासन निर्णय क्रमांकः ग्राक्षेयो-२०१५/प्र.क्र.४७/का.९, दि. ३० मार्च, २०१५ सोबतचे,**
**परिशिष्ट -“अ”**

| अ. क्र. | जिल्ह्याचे नाव | ग्रामपंचायतींचे नांव व तालुका | ग्रामपंचायतींच्या एकूण लोकसंख्याकांची प्रवर्गनिहाय लोकसंख्या व टक्केवारी | क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत हाती घ्यावयाचे विकासकाम/ विकासकामे | क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत घ्यावयाच्या विकासकामाकरिता सादर करण्यात आलेल्या अंदाजपत्रकानुसार येणारा खर्च व त्यानुसार मागणी केलेला निधी | जिल्ह्यास प्राप्त अनुदान रू. |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | रायगड | अप्पर तुडील- महाड | मुस्लीम-२२५०-९५% | १.अप्पर तुडील अंतर्गत गटार बांधणे<br>२.अपर तुडील रोड कॉंक्रीटीकरण करणे | रु. १० लक्ष | **रु. ३० लक्ष** |
| २ | | चौक- खालापूर | बौध्द-६७७-४% | १.चौक बौध्दवाडी येथे स्मशानभूमी आवारात निवाराशेड बांधणे.<br>२.पेव्हर ब्लॉक बसविणे व संरक्षक भिंत बांधणे | रु. १० लक्ष | |
| ३ | | माणगाव- माणगाव | बौध्द-७१४-५% | १.मौज जुने माणगाव बौध्दवाडी या ठिकाणी स्मशानभूमी संरक्षक भिंत स्मशानशेड व चौथरा बांधकाम करणे.<br>२. नाणोरे बौध्दवाडी अंतर्गत सिमेंट रस्ते तयार करणे. | रु. १० लक्ष | |

**एकूण रु.३०,००,०००/- (अक्षरी रू. तीस लक्ष फक्त)**

GANGURDE SANJAY SURYAKANT

Digitally signed by GANGURDE SANJAY SURYAKANT
DN: CN = GANGURDE SANJAY SURYAKANT, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = MINORITIES DEVELOPMENT,CID - 919995
Date: 2015.03.30 11:59:21 +05'30'

**( सं.सु.गांगुर्डे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**शासन निर्णय क्रमांक : ग्राक्षेयो-२०१५/प्र.क्र.४७/का.९, दि.३० मार्च २०१५, सोबतचे,**

**परिशिष्ट- "ब"**

**उपयोगिता प्रमाणपत्राचा नमुना**

प्रमाणित करण्यात येते की, अल्पसंख्याक विकास विभागाने राज्यातील अल्पसंख्याक बहुल ग्रामीण क्षेत्रात मुलभूत / पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी कार्यान्वित केलेल्या क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, ग्राक्षेयो-२०१५/प्र.क्र.४७/का.९, दि.३० मार्च २०१५ अन्वये वितरित केलेला रु. (अक्षरी रु. ) एवढा निधी पुढील विकासकामांसाठी उपयोगात आणला आहे :-

| विकासकाम/ विकासकामे | वापरलेली रक्कम |
|---|---|
| अ | |
| ब | |
| क | |
| ड | |

२. असेही प्रमाणित करण्यात येते की, क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत ज्या निकष / अटींनुसार शासनाने अनुदान मंजूर केले होते, त्या निकष/ अटींची यथायोग्यरित्या पुर्तता करण्यात आली आहे. तसेच ज्या प्रयोजनाकरिता निधि मंजूर करण्यात आला होता, त्याच प्रयोजनाकरिता निधिचा प्रत्यक्षात विनियोग झाला आहे, याची खातरजमा करण्याकरिता मी खालील दस्तऐवज/अभिलेखांची तपासणी केली आहे :-

१. प्रमाणक आणि पुस्तक लेखा (Vouchers and Book of Accounts)

२. मोजणी पुस्तके (Measurement Books)

३. सहायक अनुदान / कर्ज नोंदवही (Grant-in-aid/ Loan Register)

४. खर्च नोंदवही (Expenditure Register)

| ग्रामविकास अधिकारी / ग्रामसेवक, संबंधित ग्रामपंचायत यांची स्वाक्षरी | मुख्य कार्यकारी अधिकारी, संबंधित जिल्हा परिषद यांची प्रतिस्वाक्षरी |
|---|---|
| नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा | नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा |

***